# डुग्गू आणि कपाटातला हत्ती



लेखन व चित्रे- रेश्माबर्वे

रविवारी सकाळी सकाळीच आईनी कपाटातल्या हत्तीला बाहेर काढलं. मग काय, डुग्गू लगेच त्याच्या पाठीवर चढून बसला.



डुग्गूला घेऊन हत्ती थेट जंगलाच्या दिशेनी चालू लागला. जंगलात खूप झाडी होती. अचानक मागून एक वाघोबा आला, पण डुग्गू घाबरला नाही. तो हत्तीच्या पाठीवर होता ना!





एवढ्या मोठ्या अगडबंब हत्तीला पाहून वाघोबासुद्‌धा घाबरला आणि टुण्णकन उडी मारून पळून गेला.



वाघोबाला पळालेलं पाहताच झाडीत लपलेले छोटे छोटे प्राणी आनंदानी बाहेर पडले. सगळे प्राणी हत्तीपुढे एकदम चिंटुले दिसत होते. डुग्गू हत्तीच्या कानापाशी वाकून त्याला म्हणाला, ''जरा जपून चाल रे बाबा.''



चालता चालता वाटेत त्यांना केळीची झाडं दिसली. डुग्गूनी बसल्या-बसल्याच केळी तोडून घेतली. दोघांनी भरपूर केळी खाल्ली. तीन केळी खाऊन डुग्गूचं पोट भरलं. हत्तीनी मात्र घडच्या घड फस्त केले... तेही सालांसकट !!!





पोट भरल्यावर ढेरपोट्या हत्तीनी एक भलीमोठी ढेकरसुद्धा दिली.



ढेकर देऊन झाल्यावर हत्ती कसला शांत बसतोय!
तो आता चांगला दाणदाण धावायला लागला...

हां हां ऽऽ जोरात.. अजून जोरात..
डुग्गूला एकदम मजा वाटत होती.



हत्तीच्या धावण्यामुळे डुग्गूला चांगलेच दणके बसायला लागले. तो हत्तीच्या पाठीवर उलटापालटा पडायला लागला. थोड्या वेळानी हत्तीसुद्धा दमला आणि शांतपणे चालायला लागला. डुग्गू मस्तपैकी गाणं गायला लागला, 'ला... लाला... लालाला... हंहं...



गाता गाता वेळ कसा गेला डुग्गूला समजलंच नाही. हत्ती डुग्गूला कुठल्यातरी वेगळ्याच देशात घेऊन आला. हिरवीगार गवताची मैदानं दिसू लागली.

गार गार वाऱ्याची झुळूक येत होती. डुग्गूला हळूहळू झोप यायला लागली.

हत्ती तळ्यात उतरत होता, तेव्हा डुग्गूचे डोळे मिटत होते.





हत्ती पाण्यात शिरला
आणि छोटा छोटा
होत गेला.





पायाला गार गार काय लागतंय ?... पाणी?... आणि हे काय, हत्ती कुठे गडप झाला? डुग्गूला जाग आली तेव्हा हत्ती परत कपाटात गेला होता. "आई ऽ ऽ ऽ ...



... चड्डीत शू झालीये!"



डुग्गू राहतो इथेच, तुमच्या आमच्यातच.
पण एखाद्या कल्पनेच्या मागे निघाला,
की कुठच्या कुठे जाऊन पोहोचतो...
त्याच्या या मजेदार कल्पनांच्या राज्यात
फिरवून आणणाऱ्या या 'डुग्गूच्या गोष्टी'










३२,मंगलवाडी, से. बा. मार्ग, पुणे ४११०१६
barvereshma@gmail.com

प्रकाशक:
सकाळ पेपर्स लि.
५९५, बुधवार पेठ, पुणे २.
संपर्क : ८८८८८ ४९०५० /
०२०-२४४०५६७८.




ISBN 978-93-80571-90-4
₹ ४०/-